महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत उच्चाधिकार समितीची स्थापना करणे.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. :टीडीएस-२०१७/८/प्र.क्र.७८४/पर्यटन**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : ४ ऑगस्ट, २०१७.

**वाचा :** शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
क्र.टीडीएस-२०१५/११/प्र.क्र.१०२१/पर्यटन, दि.४ मे २०१६.

**शासन निर्णय :-**

१. शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.टीडीएस-२०१५/११/प्र.क्र.१०२१/पर्यटन, दि.४ मे २०१६ अन्वये महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ ला मान्यता देण्यात आलेली आहे.

२. **पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत मेगा प्रकल्प व अल्ट्रा मेगा प्रकल्पाचे वर्गीकरण व मर्यादा :-** पर्यटन क्षेत्रातील मेगा प्रकल्प गुंतवणूकीचे बहुउद्देशित लाभ विचारात घेऊन पर्यटन घटकाला स्थिर भांडवली गुंतवणुकीनुसार मेगा / अल्ट्रा प्रकल्पाचा दर्जा दिला जाईल जेणेकरुन थेट रोजगार निर्मिती होईल. खाली दिलेल्या तक्त्यामधील कमाल मर्यादेनुसार स्थिर भांडवली गुंतवणूक व थेट नियमित रोजगार देऊ करणार्या पर्यटन प्रकल्पामध्ये मेगा प्रकल्प / अल्ट्रा मेगा प्रकल्पांना दर्जा देण्याबाबत उच्चाधिकार समिती निर्णय घेईल.

| युनिट प्रकार | झोन वर्गीकरण | स्थिर भांडवली गुंतवणूक (रू. कोटीत) | थेट रोजगार निर्मिती | गुंतवणूक कालावधी (महिन्यात) |
|---|---|---|---|---|
| मेगा प्रकल्प युनिट | अ | १०० | ३०० | ६० |
| | ब | ५० | १५० | ४८ |
| | क | २५ | ७५ | ४८ |
| | एसटीझेड / एसटीडी | १५ | ४५ | ३६ |
| अल्ट्रा मेगा प्रकल्प युनिट | संपूर्ण राज्यात | ५०० | ७५० | ८४ |

**३.** महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ मध्ये पर्यटन प्रकल्पांना वित्तीय प्रोत्साहने देऊ करण्यात आलेली आहेत. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ च्या परिच्छेद ६ नुसार पर्यटन प्रकल्पांना Mega Project Unit व Ultra Mega Project Unit म्हणून मान्यता देण्यासाठी, अधिक प्रोत्साहने / सवलती मंजूर आणि अटी व शर्तीमध्ये सूट देण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे उच्चाधिकार समितीची स्थापना करण्यात येत आहे.

**महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ अंतर्गत उच्चाधिकार समिती**

| | |
|---|---|
| १. मा. मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. अपर मुख्य सचिव, वित्त | सदस्य |
| ३. प्रधान सचिव, नियोजन | सदस्य |
| ४. प्रधान सचिव, महसुल | सदस्य |
| ५. प्रधान सचिव (नवि १), नगर विकास | सदस्य |
| ६. प्रधान सचिव, उद्योग | सदस्य |
| ७. प्रधान सचिव, ऊर्जा | सदस्य |
| ८. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम | सदस्य |
| ९. प्रधान सचिव, पर्यटन | सदस्य |
| १०. उद्योग आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य | सदस्य |
| ११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई | सदस्य सचिव |

**३. उच्चाधिकार समितीची कार्यकक्षा व अधिकार कक्षा :-**

१. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ च्या परिच्छेद ६ नुसार पर्यटन प्रकल्पांना Mega Project Unit व Ultra Mega Project Unit म्हणून मान्यता देणे.

२. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ च्या परिच्छेद ६ नुसार अधिक प्रकल्प / प्रकरणनिहाय प्रोत्साहने / सवलती मंजूर करणे.

३. महाराष्ट्र पर्यटन धोरण २०१६ च्या परिच्छेद ६ नुसार अटी व शर्तीमध्ये सूट देणे.

४. अधिक प्रोत्साहने / सवलतींपेक्षा आणखी प्रोत्साहने / सवलती देण्याची व अटी / शर्तींमध्ये शिथिल करण्याची मागणी असल्यास त्याबाबत मंत्रीमंडळाच्या पायाभूत उपसमितीस प्रकल्प / प्रकरणनिहाय शिफारस करणे.

५. आवश्यक असल्यास उच्चाधिकार समितीवर सदस्य नसलेल्या संबंधित अधिकार्यांना समितीच्या बैठकीस बोलावण्याचे अधिकार उच्चाधिकार समितीस असतील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८२३१४०२२३४८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Laxmikant Lakhote

Digitally signed by Ravindra Laxmikant Lakhote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae5e5678dc8c9d9c01f7043448a53f6a9fbe81e46d183af43c9a9e01eb42c7c7, serialNumber=93c11f919f0c5fba6953b4841cc8cfd46b2b788da139e3f21b3d79d2cf976efa, cn=Ravindra Laxmikant Lakhote
Date: 2017.10.17 12:35:28 +05'30'

**(र.ल.लखोटे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. मंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री, पर्यटन यांचे खाजगी सचिव
५. सर्व मा. मंत्री व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई-४०००३२
७. महाराष्ट्रातील सर्व मा.संसद सदस्य / विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य.
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
९. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
वित्त/नियोजन/महसुल/नगर विकास-१/उद्योग/ऊर्जा/सार्वजनिक बांधकाम/पर्यटन
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
११. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२. सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ
१३. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र
१४. उद्योग आयुक्त, उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य
१५. पर्यटन व सांस्कतिक कार्य विभागातील सर्व कार्यासने
१६. निवडनस्ती, पर्यटन.

***